महापारेषण कंपनीशी संबंधित असलेल्या नवीन पारेषण वाहिन्या उभारण्यासाठी विद्युत अधिनियम २००३ च्या कलम ६८ अन्वये शासनाची पूर्व परवानगी तथा मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक - पावामा-२०२१/प्र.क्र.१६१/ऊर्जा-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय ,मुंबई- ४०००३२.
दिनांक :- ३० डिसेंबर, २०२१

**संदर्भ :** १) संचालक (प्रकल्प) (प्रभारी), महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित, मुंबई यांचे दिनांक २५.०६.२०२१ चे पत्र.
२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. पावामा-२०१९/प्र.क्र.३०१/ऊर्जा-४ दिनांक ३१.०५.२०१७

**प्रस्तावना :-**

राज्यातील पारेषण वाहिन्यांचे सक्षमीकरण करुन राज्याला सुरळीत वीज पुरवठा होण्यासाठी संचालक (प्रकल्प) (प्रभारी), महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित, मुंबई यांनी संदर्भ क्र. १ वरील पत्रान्वये शासनास ठाणे जिल्ह्यातील २२० के.व्ही. जांभूळ उपकेंद्रासाठी १०० के.व्ही. अंबरनाथ-मोहोने वाहिनीवर लिलो पध्दतीने वाहिनी उभारण्याचे काम प्रस्तावित केले असून सदर पारेषण वाहिनीच्या योजनेस विद्युत अधिनियम, २००३ अंतर्गतच्या कलम ६८ अन्वये पूर्वपरवानगी प्रदान करण्याची विनंती शासनास प्राप्त झाली आहे. त्यानुषंगाने सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महापारेषण कंपनीकडून ठाणे जिल्ह्यातील २२० के.व्ही. जांभूळ उपकेंद्रासाठी १०० के.व्ही. अंबरनाथ-मोहोने वाहिनीवर लिलो पध्दतीने वाहिनी उभारणीचे काम सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ प्रमाणे करण्यात येणार आहे.

परिशिष्ट - अ नमूद केलेल्या नवीन पारेषण वाहिन्यांच्या/ उपकेंद्राच्या उभारणीसाठी महापारेषण कंपनीस भारतीय विद्युत अधिनियम २००३ च्या कलम ६८ अंतर्गत खालील अटी तथा शर्तीच्या अधीन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे ;-

१. परिशिष्ट - अ मधील वीज वाहिन्याची/उपकेंद्राची उभारणी महापारेषण कंपनी स्वखर्चाने (प्रकरणपरत्वे) विहित केलेल्या प्रमाणीत पध्दतीने आणि तज्ञांच्या मार्गदर्शनाखाली व पर्यवेक्षणाखाली करेल.
२. वीज वाहिन्यांचे संचलन व सुव्यवस्था महापारेषण कंपनी स्वत: करेल.
३. वीज वाहिन्यांचा वापर महापारेषण कंपनी अथवा संबंधित ग्राहक यांनी ज्या प्रयोजनार्थ करावयाचा ठरविलेला आहे केवळ त्याच प्रयोजनासाठी करणे महापारेषण कंपनीवर वा संबंधित ग्राहकावर बंधनकारक असेल.
४. वीज वाहिन्या कार्यान्वीत करण्यापूर्वी / प्रभारीत करण्यापूर्वी याबाबतच्या सक्षम प्राधिकाऱ्यांकडून पूर्व परवानगी घेणे आवश्यक असेल.
५. वीज वाहिन्या उभारताना वा उभारल्यानंतर संबंधित जागा मालकांच्या / शेतकऱ्यांच्या जर काही तक्रारी असतील, तर त्या सक्षम प्राधिकाऱ्या समवेत विचार विनिमय करुन त्या तक्रारींचे

यथायोग्यरित्या निराकरण करण्याची ही जबाबदारी महापारेषण कंपनीची अथवा संबंधित ग्राहकाची असेल.

६. सदरहू वीज वाहिनी उभारणे व उभारुन ठेवणे, त्या अनुषंगाने आवश्यक असलेले सर्व परवाने मिळविणे, विहित केलेल्या निकषांची पूर्तता करणे तसेच शासनाचे विविध प्राधिकरण /विभाग/वीज नियामक आयोग इ. चे इतर प्रचलित नियम, त्याचप्रमाणे शासनाने वेळोवेळी मंजूर केलेले नियम व अटी महापारेषण कंपनीवर बंधनकारक राहतील.

७. विद्युत अधिनियम २००३ च्या कलम ६८ मधील अटी व शर्ती व त्यात वेळोवेळी होणारे बदल, तसेच या विभागाचा शासन निर्णय क्रं. धोरण-२०१६/प्र.क्र.५२०/ऊर्जा-४ दिनांक ३१.०५.२०१७ मधील अटी व शर्ती आणि राज्य शासन व केंद्र शासनाची अशा पारेषण वाहिन्यांसंबंधी वेळोवेळी जाहीर झालेली / होणारी मार्गदर्शक तत्वे व धोरणे सदरहू पारेषण वाहिन्यास लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२३०१६१३२९४९१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीन साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

JAWALE PRITAMKUMAR VASANTRAO

Digitally signed by JAWALE PRITAMKUMAR VASANTRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fb143f6e3b0f3286f9831e9f9ab33d9b3297b5a4e9011af5c3e07f2712833050, pseudonym=2C9876838C96A640275D3C68D207FF2BB896A20C, serialNumber=337788B3391C7F722143D26EEEA9BEFCDAD091509EF5236580A7D753D8635115, cn=JAWALE PRITAMKUMAR VASANTRAO
Date: 2021.12.30 16:15:48 +05'30'

**(प्रितमकुमार जावळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या., प्रकाशगंगा, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१

२) संचालक (प्रकल्प), महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या., प्रकाशगंगा, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई- ४०० ०५१

३) सचिव, महाराष्ट्र वीज नियामक आयोग, १३ वा मजला जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, कुलाबा, मुंबई-०५.

४) मुख्य विद्युत वितरण अभियंता-२ रा मजला, विद्युत विभाग, मुख्य कार्यालय, पार्सल कार्यालय इमारत, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस, मुंबई-४०० ००१

५) निवडनस्ती (ऊर्जा-४), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय, मुंबई-४०००३२

## परिशिष्ट – अ

## महापारेषण कंपनीने त्यांच्या योजने अंतर्गत मंजूर केलेले प्रकल्प

| **अ. क्र.** | **योजनेचा तपशील** | **योजने अंतर्गत असलेल्या वाहिनीचा तपशील** | **मान्यता क्र. व दिनांक** |
|---|---|---|---|
| १ | ठाणे जिल्ह्यातील २२० के.व्ही. जांभूळ उपकेंद्रासाठी १०० के. व्ही. अंबरनाथ मोहोने वाहिनीवर लिलो पध्दतीने वाहिनी उभारणी करणे. | i) १०० के.व्ही दुहेरी वाहिनी मनोऱ्यावर उभारणे. – ४ कि.मी.<br>ii) भूमीगत केबल-१ कि.मी. | १३७/13 दिनांक ०५.०९.२०१९ एमइआरसी मान्यता दिनांक १७.०६.२०21 किंमत रु. २७.९५ कोटी |